**शासकीय आश्रमशाळा व वसतीगृहांना अन्नधान्य, कडधान्य, किराणा माल व इतर वस्तुंचा पुरवठा करणेबाबत.....**

**महाराष्ट्र शासन**

**आदिवासी विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः शाआशा- २०१३/ प्र.क्र. ७९७ /का-१३,**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक

मंत्रालय, मुंबई:- ४०० ३२.

दिनांक :- १० सप्टेंबर, २०१५.

**वाचा :-**

शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र.शाआशा-२०१३/प्र.क्र.७९७/का-१३ दिनांक ०४.०३.२०१४.

**प्रस्तावना :-**

राज्यात आदिवासी विकास विभागाच्या शासकीय आश्रमशाळा व वसतीगृहांमधील विद्यार्थ्यांना अन्नधान्य, कडधान्य, किराणा माल व इतर वस्तुंचा पुरवठा करण्यासंदर्भात आदिवासी विकास विभागाच्या संदर्भाधिन दि. ०४.०३.२०१४ च्या शासन निर्णयान्वये सविस्तर कार्यपध्दती विहीत करण्यात आलेली आहे.

सदर शासन निर्णयामध्ये विविध वस्तुंची खरेदी निविदा मागवून करण्याबाबत प्रस्तावित केलेले आहे. मात्र पात्र निविदांपैकी जर आदिवासी उद्योजकाने/पुरवठादाराने निविदा भरल्या असल्यास आदिवासी महिला बचत गट, आदिवासी पुरुष बचत गट, आदिवासी महिला सहकारी संस्था, आदिवासी पुरुष सहकारी संस्था, आदिवासी महीला भागीदारी संस्था, आदिवासी पुरुष भागीदारी संस्था, आदिवासी महिला पुरवठादार कंपनी, आदिवासी पुरुष व सर्वसाधारण पुरवठादार कंपनी, आदिवासी महिला, आदिवासी पुरुष या प्राधान्याने निविदा न्युनतम दराने मंजूर करावी. यामध्ये जर सर्वसाधारण व्यक्ती व्यक्ती पुरवठादाराची निविदा न्युनतम असेल व आदिवासी त्या दराने पुरवठा करण्यास तयार असेल तर त्यांना प्राधान्याने पुरवठ्याचे काम देण्यात यावे अन्यथा सर्वसाधारण व्यक्तीला काम देण्यात यावे अशी तरतुद करण्यात आली आहे.

सदर तरतुद कायद्याच्या दृष्टीने सुयोग्य होण्यासाठी व त्यामध्ये अधिक स्पष्टता करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

संदर्भाधीन दि. ४.०३.२०१४ च्या शासन निर्णयात नमूद केलेल्या विविध वस्तु खरेदीसाठी निविदा मागविल्यानंतर पात्र निविदांपैकी जर आदिवासी उद्योजकाने/पुरवठादाराने निविदा भरल्या असल्यास आणि जर आदिवासी महिला बचत गट, आदिवासी पुरुष बचत गट, आदिवासी महिला सहकारी संस्था, आदिवासी पुरुष सहकारी संस्था, आदिवासी महीला भागीदारी संस्था, आदिवासी

पुरुष भागीदारी संस्था, आदिवासी महिला पुरवठादार कंपनी, आदिवासी पुरुष पुरवठादार कंपनी, आदिवासी महिला, आदिवासी पुरुष यांपैकी एखाद्याची निविदा व सर्वसाधारण पुरवठादार यांच्या निविदेतील दर जर समान असतील त्यावेळी प्राधान्याने सदरचे काम न्युनतम दर असलेल्या आदिवासी व्यक्ती/पुरवठादार/संस्था यांना देण्यात यावे.

२. शासन निर्णय दि. ४.०३.२०१४ मधील इतर तरतुदी आहेत तशाच राहतील.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०१५०९१११११४४२४००२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Subrao Narayan Shinde

Digitally signed by Subrao Narayan Shinde
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Subrao Narayan Shinde
Date: 2015.09.11 11:48:10 +05'30'

**( सु. ना. शिंदे )**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.४०० ०३२.
३. मा.मंत्री (आदिवासी विकास), मंत्रालय, मुंबई. ४०० ०३२.
४. सर्व मा. मंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
५. मा. राज्यमंत्री ( आदिवासी विकास ), मंत्रालय, मुंबई. ४०० ०३२.
६. सर्व मा. राज्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई. ४०० ०३२.
७. सर्व उप सचिव/ अवर सचिव/कार्यासन अधिकारी, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. उप सचिव ( व्यय-१४), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. निवडनस्ती (का-१३) आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई:- ४०० ०३२.